**सन २०१८-१९ करिता जागतिक कृषि गणना योजनेसाठी दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- कृगयो -२०१८/प्र.क्र.९४/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १९ डिसेंबर, २०१८

<u>वाचा :-</u> १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ -३, दि.१८.४.२०१८
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो-२०१८/प्र.क्र.९४/११-अे, दि.२३.०५.२०१८
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो-२०१८/प्र.क्र.१९२/११-अे, दि.०७.०७.२०१८
४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो -२०१८/प्र.क्र.१९२/११-अे, दि.१३.०७.२०१८
५) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१८/प्र.क्र.१९२/११-अे, दि.२८.०९.२०१८
६) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, कृषि गणना प्रभाग यांचे पत्र क्र.- ११०१४-२/२०१८-ACU, दि.२४.१०.२०१८
७) उप आयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, महराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/कृग/अनुदान/बीडीएस/प्र.क्र.२/१८-१९/३८४/२०१८, दि.२६.१०.२०१८

**<u>प्रस्तावना</u> :-**

जागतिक कृषि गणना या १००टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी (२४०१ ०९९६) सन २०१८ -१९ या वर्षाकरीता पहील्या हप्त्याची रक्कम संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आलेली आहे. आता जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी दुसऱ्या हप्त्यापोटी केंद्र शासनाकडून रु.४५०.९० लाख प्राप्त झाले आहेत. तथापि, जागतिक कृषि गणना योजनेसाठी (२४०१ ०९९६) केवळ रु.२८०.५० लाख इतक्याच रकमेची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. सबब, रु.१२२.२९ लाख इतकी रक्कम मासिक निधी वित्तीय प्रणालीवर वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने केली आहे. त्या अनुषंगाने सदर रु.१२२.२९ लाख इतकी रक्कम मासिक निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक कृषि गणना या १००टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी (२४०१ ०९९६) सन २०१८-१९ या वर्षाकरीता पहील्या हप्त्याची रक्कम संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आलेली असून आता जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी दुसऱ्या हप्त्यापोटी केंद्र शासनाने मंजुरी दिलेल्या रकमेपैकी कृषि आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार रु.१२२.२९ लाख इतकी रक्कम खालीलप्रमाणे उपलेखाशिर्षनिहाय मासिक निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रु.लाख)

| अ.क्र. | बाब | अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत निधी (पुनर्विनियोजन + प्रथम हप्ता) | दुसरा हप्त्यापोटी प्राप्त निधी | श्वेतपुस्तिकेनुसार दुसरा हप्त्यापोटी वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | ०१-वेतन | १५०.०० | ५१.९७ | ५०.०० | ५०.०० |
| २ | ११-प्रवास भत्ता | २.५० | १.२६ | १.०० | १.०० |
| ३ | १३-कार्या. खर्च | २०.०० | १०.९३ | १०.०० | ९.०७ |
| ४ | २४-पेट्रोल इंधन | १.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ५ | १६-प्रकाशने | ७.०० | ४.४१ | ०.०० | ०.०० |
| ६ | ५०-इतर खर्च | १००.०० | ३७.७८ | ३८९.९० | ६२.२२ |
| | **एकुण** | **२८०.५०** | **१०६.३५** | **४५०.९०** | **१२२.२९** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**"मागणी क्रमांक डी-३,**
**२४०१, पीक संवर्धन**
**१११ कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**केंद्र पुरस्कृत योजना**
**(००) (१०) जागतिक कृषि गणना - (१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ ०९९६)"**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये वितरीत करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२१९११३६१८२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
Date: 2018.12.19 11:44:26 +05'30'

**(अ.वि.जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३) उप-आयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५) सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) उपसचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
१२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३) निवड नस्ती, का - ११-अे.